सानुग्रह अनुदान मंजूर करणेबाबत
कै. श्री. मधुकर रमेश घलोत, सफाईगार

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो २०२०/प्र.क्र.४३४/सेवा-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १९ नोव्हेंबर,२०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९.९.२०१८
२) संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, पुणे-१ यांचे पत्र क्र. संआसे / संचालक कक्ष/ प.अं.नि.यो/ सानुग्रह अनुदान/प्रशासकीय मान्यता/५१०४९ ५२/२०२०,दि.३०.०९.२०२०
३) श्रीमती ज्योती मधुकर घलोत यांचा दि.निरंक चा अर्ज.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त क्र.२ अन्वये संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, पुणे-१ यांच्याकडून कै.श्री.मधुकर रमेश घलोत, सफाईगार यांच्या कायदेशीर वारसास सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे.अनुक्रमांक ३ येथील श्रीमती ज्योती मधुकर घलोत यांच्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९/९/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार कै.श्री.मधुकर रमेश घलोत, सफाईगार यांच्या कायदेशीर वारस म्हणून नामनिर्देशित व्यक्तीस म्हणजे त्यांच्या पत्नीस श्रीमती ज्योती मधुकर घलोत यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करण्यात येत आहे.

सदर सानुग्रह अनुदान शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा पूर्ण होण्यापूर्वी दि.२०.१०.२०१४ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्ष कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदरचा खर्च मागणी क्र. जी-६-२०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी १०३ अनुकंपा भत्ते (००)(०६)-परिभाषित अंशदान /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरचा शासन आदेश वरील संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील अ.क्र.५ येथे नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून,त्याचा संकेतांक २०२०१११९१२००२१९९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b4e19876ab3eec36e3a3b988441648ab87470cdfe66b14cfbe7ac9bd770485c1, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2020.11.20 11:39:08 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, पुणे-१
२. उपसंचालक आरोग्य सेवा,नाशिक मंडळ, नाशिक
३. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी /कोषागार अधिकारी
४. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नाशिक
५. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय वाऱ्हे, ता.सुरगाणा, जि. नाशिक
६. श्रीमती ज्योती मधुकर घलोत, घर नं २१०, पंचशिल नगर, जि.पी.ओ. मागे, नाशिक-१ यांना माहितीस्तव
७. निवड नस्ती /सेवा-५